**कोल्हापूर जिल्हयातील राष्ट्रीय सामाजिक अर्थसहाय्य कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय्याचे बायोमेट्रिक पध्दतीने वाटप करण्याच्या प्रकल्पाचे उद्‌घाटनाचा खर्च भागविण्यासाठी निधीचे वितरण करणे.**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : विसयो-२०११/प्र.क्र.१४३/विसयो-२
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :१७ नोव्हेंबर, २०११.

**वाचा :-** १) केंद्र शासनाचे ज्ञापन क्र.J-११०६०/६१२००९-NSAP, दि.२९ सप्टेंबर,२०१०.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.विसयो-२०१०/ प्र.क्र.१८५//विसयो-२, दि.४ जानेवारी,२०११.
३) शासन पत्र, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.विसयो-२०११/ प्र.क्र.९८//विसयो-२, दि.२६ एप्रिल,२०११.
४) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र क्र.कार्या-११अ/संगायो/ आरआर/१०९८/११, दि.३ नोव्हें,२०११

**शासन निर्णय :-** राष्ट्रीय सामाजिक अर्थसहाय्य कार्यक्रमांतर्गत योजनांतील अर्थसहाय्याचे लाभार्थ्यांना बायोमेट्रिक पध्दतीने स्मार्ट कार्डाचा वापर करुन त्यांचे गावाचे जवळपासचे ठिकाणी वाटप करण्यासाठी आय.सी.आय.सी.आय.बँकेच्या सहयोगाने प्रायोगिक तत्वावर प्रकल्प संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ठाणे, कोल्हापूर व बीड या जिल्हयात हाती घेण्यात आला आहे.

२. सदर प्रकल्पांतर्गत अर्थसहाय्य वाटपाचा शुभारंभ मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे शुभहस्ते रविवार दिनांक १६ सप्टेंबर,२०११ रोजी कसबा, सांगाव, ता. कागल, कोल्हापूर येथे आयोजित करण्यात आला होता. या कार्यक्रमासाठी रु.८,५०,०००/- (रुपये आठ लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या खर्चास संदर्भ क्र.३ येथील आदेशान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. आता संदर्भ क्र.४ येथील पत्रानुसार प्राप्त झालेल्या प्रस्तावाप्रमाणे याद्वारे या कार्यक्रमाचा खर्च भागविण्यासाठी रु. ६,७७,१७०/- (रुपये सहा लक्ष सत्त्याहत्तर हजार एकशे सत्तर फक्त) कोल्हापूरइतकी तरतूद जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना वितरीत करण्यात येत आहे, तसेच या खर्चासाठी जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. केंद्र शासनाचे संदर्भ क्र.१ येथील ज्ञापनातील परिच्छेद-१ (c) Information, Education & Communication-Awareness Generation Activities या तरतूदीनुसार या खर्चासाठी निधी वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर खर्च " मागणी क्र.एन-३, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४-वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण (०८)(०६) ईंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना व राष्ट्रीय कुटुंब लाभ योजना अंमलबजावणीसाठी प्रशासकीय खर्च (केंद्र पुरस्कृत योजना)(२२३५

३०१४) ५०-इतर खर्च " या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ साठी जिल्हाधिकारी, कोल्हापूरयांना वितरीत केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा. तसेच वेळोवेळी खर्चाच्या रक्कमांचा मेळ घाळण्याची दक्षता घ्यावी.

५. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी प्रस्तुत वितरीत निधीतून केलेल्या खर्चाचा सविस्तर तपशिल शासनास सादर करावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३६/व्यय-१४,दि.२-१२-२०१० च्या अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक क्रमांक - 201111171133170001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ग. कि. वाघ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति
विभागीय आयुक्त, पुणे विभाग.
जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
संचालक ,लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
वित्त विभाग, अर्थसंकल्प-७ व व्यय १४, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (अर्थसंकल्प) सा.न्या.सां.का.वि.स. विभाग,मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (विसयो-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
निवड नस्ती, विसयो-२